**महाराष्ट्र राज्यात आदिवासी कल्याणाच्या विकासाच्या क्षेत्रात उल्लेखनीय कामकरणा-या व्यक्तीस /सामाजिक संस्था यांना आदिवासी सेवक पुरस्कार /आदिवासी सेवा संस्था पुरस्कार देण्याबाबत ........**

**एकत्रिकरण व सुलभीकरण करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. आसेप-१०९९/प्र.क्र.६/का-५,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**

**दिनांक : २७ जानेवारी, १९९९.**

**शासन निर्णय :** महाराष्ट्र राज्यातील आदिवासींच्या कल्याणाच्या / विकासाच्या क्षेत्रात उल्लेखनीय कार्य करणा-या व्यक्तीस तसेच सामाजिक संस्था यांना आदिवासी सेवक व आदिवासी सेवा संस्था पुरस्कार प्रदान करण्याची योजना, शासनाने दिनांक २५ ऑगस्ट, १९८८ च्या आदेशानुसार मंजूर करण्यात आली. वरील योजनेंतर्गत वेळोवेळी केलेल्या सुधारणा/बदल विचारात घेऊन **आदिवासी सेवक** व **आदिवासी सेवा संस्था पुरस्कार** प्रदान करण्याचे संदर्भात सर्व आदेश एकत्रित करुन शासन खालीलप्रमाणे सुधारित कार्यपध्दती विहीत करीत आहे :-

१) **आदिवासी सेवक पुरस्कार** हा १५ सामाजिक व्यक्तिंना देण्यात यावा तसेच **आदिवासी सेवा संस्था पुरस्कार** हा ७ सामाजिक संस्थांना देण्यात यावा.

२) **आदिवासी सेवक पुरस्कार** प्राप्त व्यक्तीस रु.१०,००१/- (रुपये-दहा हजार एक फक्त) व **आदिवासी सेवा संस्था पुरस्कार** प्राप्त संस्थेस रु.२५,००१/- (रुपये-पंचवीस हजार एक फक्त) एवढी रक्कम पुरस्कार म्हणून देण्यात यावी.

३) **निवड समिती :-** सदर पुरस्कारासाठी योग्य उमेदवारांची / संस्थांची दरवर्षी निवड करण्यासाठी, मा.मंत्री (आदिवासी विकास) यांच्या अध्यक्षतेखाली निवड समिती खालील प्रमाणे राहील :-

| | | |
|---|---|---|
| | १) मा.मंत्री (आदिवासी विकास) | : अध्यक्ष. |
| | २) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) | : उपाध्यक्ष. |
| # | ३) विधानसभा सदस्य (आदिवासी राखीव मतदारसंघ) | : सभासद. |
| # | ४) विधानसभा सदस्य (आदिवासी राखीव मतदासंघ) | : सभासद. |
| | ५) सचिव (आदिवासी विकास) | : सभासद. |
| | ६) आयुक्त (आदिवासी विकास) | : सदस्य-सचिव. |

# ( टीप : निवड समितीवर अनुसूचित जमातीच्या राखीव मतदारसंघातून निवडून आलेल्या दोन विधानसभा सदस्यांची सभासद म्हणून नियुक्ती करण्याचा अधिकार मा.मंत्री (आदिवासी विकास) यांना राहील.)

२. सदर योजनेची नियमावली या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट **अ, ब, क** आणि **ड** मध्ये देण्यात आल्या आहेत.

३. **<u>पुरस्कार प्रदान :</u>**

शासनाने ठरविलेल्या स्थळी एखाद्या खास जाहीर शासकीय समारंभात हा पुरस्कार एखाद्या मान्यवर व्यक्तीच्या हस्ते (उदा.राज्यपाल, केंद्रीय मंत्री, मुख्यमंत्री, मंत्री इत्यादी) दरवर्षी २९ नोव्हेंबर रोजी आदिवासींचे आद्यसेवक परमपूज्य ठक्करबाप्पा यांच्या जन्मदिवशी साजरा करण्यात यावा. सदर समारंभ आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडून आयोजित करण्यात यावा.

४. **आदिवासी सेवक** पुरस्कार प्राप्त व्यक्ती आणि **आदिवासी सेवा संस्था** पुरस्कार प्राप्त संस्थेचे प्रतिनिधी हे राज्य पुरस्कार वितरण समारंभाच्या कालावधीत तीन दिवसांकरिता शासकीय पाहुणे म्हणून समजण्यात येतील.

५. **आदिवासी सेवक** व **आदिवासी सेवा संस्था** पुरस्काराकरिता निवड केलेल्या व्यक्तींची/ संस्थांची नांवे महाराष्ट्र शासन राजपत्रामध्ये (सर्वसाधारण भाग) प्रसिध्द करण्यात यावी.

६. **आदिवासी सेवक** आणि **आदिवासी सेवा संस्था** पुरस्कार वितरणाकरिता होणारा खर्च, "मागणी क्र.टी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण-०२-अनुसूचित जमातीचे कल्याण-००१-संचालन व प्रशासन (१) (ए) जनजाती कल्याण आयुक्तालय (२२२५ १०२५) " या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना सदर पुरस्कार वितरणासाठी येणा-या खर्चास मंजूरी देण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. हे आदेश, शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिआरआय-१०८८/प्र.क्र.१९६/का-६, दिनांक २५ ऑगस्ट, १९८८ व शासन निर्णय, क्र.आसंसं-१०९२/प्र.क्र.४३/९२/का-५, दिनांक ६ नोव्हेंबर, १९९२ अन्वये काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

**( वि.रा.बचेरे )**
उप सचिव.

प्रति,

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
संचालक, समाजकल्याण, पुणे.
सर्व विभागीय आयुक्त.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.
सर्व जिल्हाधिकारी व पदसिध्द अपर आयुक्त, आदिवासी विकास.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी व पदसिध्द अपर आयुक्त, आदिवासी विकास.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
प्रसिध्दी संचालनालयातील आदिवासी विकास विभागाचे संपर्क अधिकारी.
मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे स्वीय सहाय्यक.
मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे स्वीय सहाय्यक.
सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक.
उप सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक.
आदिवासी विकास विभागातील सर्व अधिकारी/सर्व कार्यासने.
निवड नस्ती (का-५), आदिवासी विकास विभाग.

## परिशिष्ट - 'अ'

आदिवासी कल्याण व विकास क्षेत्रातील आदिवासी सेवकांना / आदिवासी सेवा संस्थांना राज्य पुरस्कार देण्याबाबतचे मान्य नियम ( एकत्रित )

### (१) संक्षिप्त नांव व्याप्ती :-

या नियमांना, आदिवासी सेवकांना / आदिवासी सेवा संस्था यांना राज्य पुरस्कार देण्याबाबतचे नियम म्हटले जाईल. "आदिवासी कल्याण व आदिवासी विकास" या क्षेत्रात नेत्रदिपक कामगिरी करणा-या समाजसेवकांना व सामाजिक स्वयंसेवी संस्थांना हा पुरस्कार प्राप्त होईल. ( यात यापुढे त्यांस पुरस्कार म्हणून संबोधले आहे ) हे नियम आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रासही लागू होतील.

### (२) उद्दिष्ट :-

आदिवासी कल्याण व आदिवासी विकास हया क्षेत्रातील विकास कार्यास उत्तेजन देणे व या क्षेत्रात नेत्रदिपक काम करणा-या समाजसेवकांचा आणि सामाजिक सेवा संस्थांच्या सेवेचा व कार्याचा गौरव करणे हे या पुरस्काराचे उद्दिष्ट आहे.

### (३) सामाजिक कार्य :-

हे नेत्रदिपक कार्य आदिवासी शिक्षण, आरोग्य, शेती, वन, वनीकरण, पर्यावरण, सहकार, कुटीर-उद्योग, संस्कृती, संवर्धन, साहित्य, कला, वाङःमय, अन्याय-निर्मुलन, रुढी, अंधश्रध्दा-निर्मुलन, जनजागरण इत्यादी क्षेत्रातील असावे.

### (४) पुरस्कार :-

पुरस्कारात पुढील गोष्टींचा समावेश असेल.

(अ) आदिवासी सेवकांसाठी :-

१) शासनाने रितसर मान्यता दिलेले सन्मानपत्र.
२) रु.१०,००१/- ( रुपये- दहा हजार एक फक्त ) चा रोख पुरस्कार.
३) आदिवासी सेवक व त्याची पत्नी अथवा पती यांना शाल, श्रीफळ व दोन मौलिक ग्रंथ.

ब) आदिवासी सेवा संस्थांसाठी :-

१) शासनाने रितसर मान्यता दिलेले सन्मानपत्र.
२) शिल्ड-ज्यावर संस्थेचे नांव व कार्याचा गोषवा-याचा समावेश असेल.
३) रु.२५,००१/- (रुपये पंचवीस हजार एक फक्त) चा रोख पुरस्कार.
४) शाल, श्रीफळ व दोन मौलिक ग्रंथ.

## ( ५ ) पात्रता :-

### अ) आदिवासी सेवक पुरस्कार :-

१) 'आदिवासी कल्याण व आदिवासी विकास' या क्षेत्रात नेत्रदिपक कामगिरी करणा-या समाजसेवकांनाच हा पुरस्कार दिला जाईल.

२) आदिवासी कल्याण आणि आदिवासी विकास या क्षेत्रात त्यांनी कमीत-कमी १० वर्षे कार्ये व सेवा केलेली असावी.

३) पुरस्कार मिळणा-या समाज सेवकांचे पुरस्कार दिल्या जाण्याचे वेळी ४५ वर्षापेक्षा जास्त वय असावे. एखाद्या अपवादात्मक प्रकरणात वयाची अट शिथिल केली जाऊ शकेल.

४) स्वतःच्या आयुष्यात एकापेक्षा जास्त वेळा पुरस्कार मिळण्यास कोणतीही व्यक्ती पात्र ठरनार नाही.

५) जात, धर्म, लिंग, पंथ, क्षेत्र इत्यादीचा विचार न करता फक्त आदिवासी कल्याण व आदिवासी विकास या क्षेत्रातील कामाच्या शर्थीच्या अधीन राहून हा पुरस्कार दिला जाईल.

६) पुरस्कार मिळविणारी व्यक्ती ही पुरस्कार वर्षात आमदार, खासदार, जिल्हा परिषद अध्यक्ष, उपाध्यक्ष, पंचायत समिती सभापती किंवा कोणत्याही शासकीय अधिकार पदावर नसावी. खास बाब म्हणून समिती अशा व्यक्तींचा विचार करु शकते. परंतु सदर व्यक्तीचे कार्य वादातीत व उच्च दर्जाचे असावे. त्यासाठी समिती फक्त शिफारस करेल. अंतिम निर्णय शासनाकडून घेतला जाईल.

### (ब) आदिवासी सेवा संस्था पुरस्कार :-

१) आदिवासी क्षेत्रात आदिवासींच्या उन्नतीसाठी शिक्षण, आरोग्य, शेती, सहकार, वन, वनीकरण, पर्यावरण, कुटीर-उद्योग, संस्कृती, कला, साहित्य, वाङःमय, अन्याय-निर्मुलन, अंधश्रध्दा, रुढी-निर्मुलन, जनजागरण इत्यादी क्षेत्रात कार्य करणा-या सामाजिक संस्थांना हा पुरस्कार दिला जाईल.

२) स्वयंसेवी संस्था पंजिबध्द ट्रस्ट ॲक्ट १९५० अथवा सोसायटी रजिस्ट्रेशन ॲक्ट अनुसार पंजिबध्द असावी.

३) स्वयंसेवी संस्था राजकारणापासून अलीप्त असावी. तसेच तीचे कार्य व सेवा ही पक्षातीत व राजकारणापासून स्वतंत्र व अलिप्त असावी.

४) स्वयंसेवी संस्थेचे वरील क्र.१ मध्ये दर्शविलेले आदिवासी क्षेत्रातील सेवा व कार्य १० वर्षाहून अधिक असावे. विशेष मौलिक व भरीव कार्य करणा-या संस्थांच्या बाबतीत अट अपवाद म्हणून करण्यात येईल.

५) जात, धर्म, पंथ, क्षेत्र इत्यादीचा विचार न करता फक्त आदिवासींची सेवा आणि आदिवासी विकास या क्षेत्रातील कामाचा विचार करुनच हा पुरस्कार स्वयंसेवी संस्थांना दिला जाईल.

**(६) पुरस्काराची संख्या :-**

(अ) आदिवासी सेवक :-

एकूण पंधरा (१५) पुरस्कार देण्यात येतील.

(ब) आदिवासी सेवा संस्था पुरस्कार :-

एकूण सात (७) पुरस्कार देण्यात येतील.

**(७) प्रस्ताव शिफारस करण्याची पध्दत :-**

विहीत नमुन्यात माहितीचे फॉर्म (आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक) यांच्या नांवे लिहिलेले असावेत व संबंधित प्रकल्प अधिका-याचे रितसर शिफारस केलेले अर्जअपर आयुक्त, आदिवासी विकास यांचे मार्फत आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडे पाठवावेत.

**(अ) आदिवासी सेवक पुरस्कारासाठी :-**

शिफारस करणा-या अधिका-यांनी आपल्या शिफारस पत्रासोबत खालील माहितीसह आलेले अर्ज, आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडे पाठविले पाहिजेत.

(अ) शिफारस केलेल्या व्यक्तिंची संपूर्ण वैयक्तिक माहिती.
(ब) कोणताही गैरव्यवहार केला नसल्याचे प्रमाणपत्र.
(क) शिफारस केलेल्या व्यक्ति विरुध्द गैरवर्तुनुकीबाबत खटला भरलेला नसल्याचे किंवा तिच्या वरील गैरवर्तुनुकीबाबत किंवा सार्वजनिक निधीचा अफरातफर केल्याचा आरोप शाबीत झाला नसल्याचे प्रमाणपत्र.
(ड) पुरस्कारार्थीने साध्य केलेली विशेष मजल व नेत्रदिपक कामगिरी.
(इ) संबंधित व्यक्तीचे पासपोर्ट आकाराचे तीन फोटो.
(फ) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडे आलेल्या वैयक्तिक अर्जाचा विचार केला जाणार नाही.
(ग) अपूर्ण शिफारशी विचारात घेतल्या जाणार नाहीत.
(ह) संबंधित अधिका-याने शिफारस केली नसेल तर, आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक स्वत:च सरकारकडे पाच योग्य व्यक्तींची शिफारस करु शकेल.

**(ब) आदिवासी सेवा संस्था पुरस्कारासाठी :-**

शिफारस करणा-या अधिका-यांनी आपल्या शिफारस पत्रासोबत खालील कागदपत्रे आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडे पाठविली पाहिजेत.

(अ) संस्था पब्लिक ट्रस्ट ॲक्ट व / वा सोसायटी रजिस्ट्रेशन ॲक्ट १८६० खाली पंजीबध्द असल्याचे प्रमाणपत्र.

(ब) संस्थेचे कार्य पक्षातीत व राजकारणापासून अलिप्त असल्याबाबतचे प्रमाणपत्र.

(क) संस्थेच्या कार्यासंबंधी थोडक्यात माहिती व संस्था आदिवासी कल्याण व विकास या क्षेत्रात कोणते भरीव कार्य करते व आतापर्यंत संस्थेने उद्दिष्ट कितपत साध्य केले आहे यासंबंधीचा अहवाल.

(ड) संस्थेचा आर्थिक व्यवहारात कोणताही गैरव्यवहार नसल्याबाबतचे प्रमाणपत्र.

(इ) संस्थेच्या घटनेची प्रमाणित प्रत व मागील ५ वर्षाचे वार्षिक अहवाल.

**(८) आलेल्या शिफारशींची छाननी :-**

आयुक्त,आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक हे आदिवासी सेवक पुरस्कारासाठी व आदिवासी सेवा संस्था पुरस्कारासाठी आलेल्या सर्व प्रस्तावांची छाननी करतील व शिफारस होऊन आलेल्या पुस्तिकेच्या स्वरुपात शासनाकडे विचारार्थ सादर करतील.

**(९) पुरस्कार शिफारस करणे प्राधिकरण :-**

आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक आलेले सर्व अर्ज, संकलित केलेले प्रस्ताव व शिफारशी या प्रयोजनाखाली नियुक्त केलेल्या निवड समितीस सादर करतील.

(अ) समिती सर्व प्रस्ताव तपासून त्यावर विचार करील व आदिवासी सेवक व आदिवासी स्वयंसेवी संस्था निवडीसंबंधीच्या आपल्या शिफारशींसह शासनाच्या आदिवासी विकास विभागाकडे मान्यतेसाठी पाठविल. शासनाची मान्यता मिळाल्यानंतर पुरस्कार शासकीय निर्णयाद्वारे व राजपत्रातून जाहीर केले जातील.

(ब) शासनाची मान्यता ही अंतिम असेल व त्याविरुध्द कोणाकडेही अपिल करता येणार नाही.

(क) एखाद्या व्यक्तीला दिलेला आदिवासी सेवक पुरस्कार वा एखाद्या संस्थेला दिलेला आदिवासी सेवा संस्था पुरस्कार कोणत्याही वेळी, कोणतेही कारण न दाखविता रद्द करण्याचा अधिकार, शासनाने राखून ठेवला आहे. त्यानंतर पुरस्कार स्वीकारलेल्या व्यक्तीने तो पुरस्कार (आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक) यांना परत केला पाहिजे.

**(१०) पुरस्कार प्रदान :-**

शासनाने ठरविलेल्या स्थळी एखाद्या खास जाहीर शासकीय समारंभात हा पुरस्कार एखाद्या मान्यवर व्यक्तीच्या हस्ते (उदा:- राज्यपाल, केंद्रीय मंत्री, मुख्यमंत्री,मंत्री) दिलाजाईल. पुरस्कार मिळालेल्या व्यक्तीला हा पुरस्कार व्यक्तीशः दिला जाईल व संस्थेतर्फे हा पुरस्कार अध्यक्ष, उपाध्यक्ष अथवा संस्थेने प्राधिकृत केलेल्या व्यक्तीला दिला जाईल.

**(११) समारंभाचा दिवस :-**

शासनाने ठरविलेल्या दिनांक २९ नोव्हेंबर, रोजी आदिवासींचे आद्यसेवक पूज्य ठक्करबाप्पा यांच्या जन्मदिनाचे शुभदिनी प्रतिवर्षी साजरा केला जाईल तो पूज्य ठक्करबाप्पा दिन म्हणून पाळला जाईल.

**(१२) खर्च :-**

पुरस्कार देण्याच्या समारंभासाठी होणारा खर्च, निवड समितीच्या बैठकींना हजर असणा-या बिगर शासकीय सदस्यांची प्रवास भत्ता बिले व इतर आकस्मित खर्च आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडून सोबत जोडलेल्या खर्चाच्या प्रमाण धर्तीनुसार या प्रयोजनासाठी आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक हयांचे नियंत्रणाखालील दिलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल. शासनाने दिलेल्या तरतूदीची प्रमाणपध्दती, प्रसंगानुरुप व आवश्यकतेनुसार ठरविण्याचे अधिकार आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांना असतील.

---

# <u>परिशिष्ट - 'ब'</u>

आदिवासी क्षेत्रात आदिवासींच्या आर्थिक, सामाजिक व शिक्षण इ. उन्नतीसाठी कार्य करणा-या सामाजिक संस्थांना 'आदिवासी सेवा संस्था पुरस्कार' देण्याबाबातची मान्य नियमावली.

---

(१) आदिवासी क्षेत्रात आदिवासींची सेवा, विकास कार्य, उन्नती व जनजागृतीसाठी कार्य करणा-या स्वयंसेवी संस्था हया पुरस्कारासाठी पात्र राहतील.

(२) संस्था पब्लिक ट्रस्ट ॲक्ट १९५० व / वा सोसायटीज् रजिस्ट्रेशन ॲक्ट १८६० अनुसार पंजीबध्द असणे आवश्यक आहे.

(३) संस्थेचे कार्य राजकारणापासून अलिप्त असावे. तसेच संस्था पक्षातीत व राजकारणापासून अलिप्त असावी. संस्थेची आदिवासी क्षेत्रातील सेवा व कार्य १० वर्षाहून अधिक काळ असावी. सेवा व कार्याचा कालावधी संस्थेच्या कार्याचा व सेवेचा दर्जा लक्षात घेऊन अपवादात्मक परिस्थितीत कमी करण्याचे अधिकार निवड मंडळास राहतील.

(४) संस्थेने आदिवासी सेवा पुरस्कार मिळविण्यासाठी आपला निर्धारित नमुन्यातील प्रस्ताव (दोन प्रतीत) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांचे मार्फत आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना दरवर्षी निर्धारित करतील त्या तारखेपूर्वी सादर करावे लागतील.

(५) प्रस्तावातील संबंधित संस्थेने संस्था स्थापन झाल्यापासून केलेल्या कार्याचा आढावा, संस्था चालवित असलेल्या अधिनस्त योजनांची माहिती, सध्या चालू असलेले कार्य व पुढे घ्यावयाच्या विविध योजना बाबतची सविस्तर माहिती सादर करणे आवश्यक आहे.

(६) प्रस्तावासोबत संस्थेच्या घटनेची प्रत व मागील पाच वर्षाचे वार्षिक अहवाल जोडणे आवश्यक आहे. संस्थेला मिळालेल्या अनुदानाची वार्षिक मदतीची व संस्थेने स्वयंस्फुर्तीने उभ्या केलेल्या आर्थिक तरतूदीची माहिती देणे जरुरीचे आहे.

(७) आदिवासी क्षेत्रात आदिवासींसाठी शिक्षण, आरोग्य, शेती, सहकार, वन, वनीकरण, पर्यावरण, कुटीर-उद्योग, संस्कृती संवर्धन, अंधश्रध्दा-निर्मुलन, कला, जनजागरण,अन्याय निर्मुलन,साहित्य, वाङःमय इत्यादी क्षेत्रात कार्य करणा-या वरील अट क्र. दोन, तीन व चार अनुसार पात्रता धारण करणा-या सामाजिक संस्था हया पुरस्काराकरिता योग्य समजण्यात येतील.

(८) प्रस्ताव सादर केलेल्या सामाजिक संस्थेचे निरिक्षण करण्याचा तसेच त्यांनी केलेल्या कार्याचा प्रत्यक्ष आढावा घेण्याचा अधिकार, आदिवासी विकास विभागाला राहील.

( ९) सामाजिक संस्थामध्ये कोणत्याही प्रकारचा गैरव्यवहार वा आर्थिक दुर्व्यवहार झालेला नसावा.

(१०) प्राप्त झालेल्या प्रस्तावातून शासनाने नियुक्त केलेली समिती दरवर्षी ७ सामाजिक संस्थांची निवड करण्याची शिफारस शासनास करील.

(११) राज्य पुरस्कार एका संस्थेला एकदाच देण्यात येईल.

(१२) निवड समितीच्या शिफारशीनुसार शासन अशा संस्थांची निवड करुन पुरस्कार जाहीर करील.

(१३) पुरस्कारात पुढील गोष्टींचा समावेश असेल :-

अ) शासन मान्य पुरस्कृत प्रमाणपत्र व शिल्ड.

ब) रु.२५,००१/-(रुपये पंचवीस हजार एक फक्त) रुपयांचा रोख पुरस्कार.

क) दोन मौलिक ग्रंथ.

(१४) संकीर्ण :- रोख पुरस्काराची रक्कम ही संस्थेने चालविलेल्या सेवा कार्यासाठी खर्च करावी अशी शासनाची अपेक्षा राहील.

---

## परिशिष्ट ‘क’

आदिवासी सेवकांना व आदिवासी सेवा संस्थांना राज्य पुरस्कार देण्याच्या समारंभासाठी करावयाच्या खर्चाची मान्य प्रमाणपध्दती.

---

बाबी :-

| | | |
|---|---|---|
| १. पुरस्कार विजेत्यास रोख बक्षीस: | १) | प्रत्येक पुरस्कार विजेत्यास आदिवासी सेवकास रु.१०,००१/-रोख ( रु.दहा हजार एक फक्त ) |
| | २) | प्रत्येक पुरस्कार विजेत्या आदिवासी सेव संस्थेस रु.२५,००१/-रोख (रु.पंचवीस हजार एक फक्त) |
| २.पुरस्कार विजेत्यास प्रवास भत्ता : | १) | आदिवासी सेवक पुरस्कार व्यक्तीच्या निवासस्थानापासून समारंभाच्या स्थळापर्यंत रेल्वेच्या पहिल्या वर्गाचे जोण्यायेण्याचे भाडे किंवा बस टॅक्सीचे प्रत्यक्ष भाडे पुरस्कार विजेत्या व त्याची पत्नी अथवा पती असे दोघेजण वरीलप्रमाणे प्रवास भत्त्यास पात्र असतील. |
| | २) | आदिवासी स्वयंसेवी संस्था पुरस्कार प्राप्त करणा-या संस्थेचे अध्यक्ष वा उपाध्यक्ष वा संस्थेने प्राधिकृत केलेली व्यक्ती संस्थेच्या ठिकाणापासून समारंभाच्या स्थळापर्यंतचे रेल्वेचे पहिल्या वर्गाचे जाण्यायेण्याचे भाडे किंवा एस.टी.बसचे भाडे. |
| ३. इतर सेवा व सुविधा : | १) | आदिवासी सेवक पुरस्कार विजेत्यास त्याच्या पत्नीसह अथवा पतीसह शासनाने पुरस्कार प्रदानासाठी ठरविलेल्या गावी जास्तीतजास्त तीन दिवसापर्यंत शासनाचे पाहुणे समजले जाईल व त्यांचा प्रवास स्थानिक वाहतुक, निवास, भोजन इ.खर्च शासनाद्वारे केला जाईल. शासनाने विहीत केलेल्या श्रेणीनुसार पुरस्कार मिळविणारा त्याच्या पत्नीसह / पतीसह राज्यस्तरीय समितीच्या बिगर शासकीय सदस्यांना अनुज्ञेय असलेला प्रवास भत्ता/सवलती इत्यादी मिळण्यास पात्र समजण्यात यावा. |
| | २) | आदिवासी स्वयंसेवी संस्था पुरस्कार मिळविणा-या संस्थेतर्फे त्या संस्थेचे अध्यक्ष वा उपाध्यक्ष वा संस्थेतर्फे प्राधिकृत केलेल्या व्यक्तीस, पुरस्कार ठरविलेल्या गावी |

जास्तीत जास्त तीन दिवसांपर्यंत शासनाचे पाहुणे समजण्यात येईल आणि त्यांचा प्रवास स्थानिक वाहतुक, भोजन इ.खर्च शासनाद्वारे केला जाईल. शासनाने विहीत केलेल्या श्रेणीनुसार पुरस्कारासाठी येणारी व्यक्ती राज्यस्तरीय समितीच्या बिगर शासकीय सदस्यांना अनुज्ञेय असलेला प्रवासभत्ता/सवलती मिळण्यास पात्र समजण्यात येईल.

| | |
|---|---|
| ४.प्रमाणपत्र व त्यासोबत भेटवस्तू: | १) आदिवासी सेवक पुरस्कार मिळविलेल्या व्यक्तीस सन्मानपत्र शाल, श्रीफळ व दोन उपयुक्त ग्रंथ देण्यात येतील व पुरस्कार विजेत्याच्या पत्नीस किंवा पतीस एक शाल व श्रीफळ व दोन ग्रंथ दिले जाईल. |
| | २) आदिवासी सेवा संस्था पुरस्कार मिळविलेल्या संस्थेतर्फे पुरस्कार स्विकारणा-या व्यक्तीस प्रमाणपत्र व शिल्ड, शाल, श्रीफळ व दोन ग्रंथ दिले जाईल. |
| ५. इतर संकीर्ण व अकल्पित खर्च : | लघुपुस्तके, आमंत्रण पत्रिका यांच्या छपाईचा खर्च,हार, पुष्पगुच्छ, फर्निचर भाडे, हॉलचे भाडे, निवासभाडे, वाहतुक खर्च, तबके, छायाचित्रे, हॉल डेकोरेशन अल्पोपहार, संकीर्ण खर्च उदाहरणार्थ आदिवासी सेवक व त्यांच्या पत्नी/पतीस टॉवेल, साबण इत्यादी खर्च वाजवी प्रमाणात केले जातील. |
| ६. निवड समितीच्या सभांना हजर राहणाऱ्या आमदारांसह इतर बिगर शासकीय सदस्यांना प्रवासभत्ता. | राज्यस्तरीय समितीच्या बैठकीला हजर राहणा-या बिगर शासकीय सदस्यांसाठी शासनाने विहीत केलेल्या प्रमाणानुसार. |

<u>टीप :-</u> अ) प्रमाणपत्रे, लघुपुस्तके, आमंत्रणपत्रिका यांची छपाई शासकीय मुद्रणालयातून करुन घ्यावी. आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक आहरण व संवितरण अधिकारी असतील आणि या प्रयोजनासाठी विहीत केलेल्या प्रमाणपध्दतीनुसार समारंभासाठी होणारा खर्च मंजूर करण्याचा, रक्कम काढण्याचा व खर्च करण्याचा प्राधिकार त्यांना देण्यात यावा.

ब) मंत्रालयातील आदिवासी विकास विभागाकडे या योजनेसाठी अर्थसंकल्पात दरवर्षी तरतूद केली गेल्याची खात्री करुन घेण्याची दक्षता आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी घ्यावी व त्यांचा प्रस्ताव शासनाकडे वेळेवर आदिवासी विकास विभागाकडे पाठवून देतील

क) आदिवासी विकास विभागाचे सचिव व आयुक्त, आदिवासी विकास हे प्रयोजनासाठी निमंत्रण अधिकारी असतील.

## परिशिष्ट 'ड'

आदिवासी विकास विभाग
आयुक्तालय, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

आदिवासी सेवक पुरस्कारासाठी उमेदवाराने माहिती भरुन पाठवावयाचे प्रपत्र.

---

मा.आयुक्त,
आदिवासी विकास आयुक्तालय,
महाराष्ट्र राज्य, नाशिक.

विषय : राज्य पुरस्कार 'आदिवासी सेवक'साठी माहिती.

महोदय,

" आदिवासी सेवक " या राज्य पुरस्कारासाठी उमेदवाराविषयी माहिती विहीत नमुन्यात भरुन पाठवित आहे. आवश्यक तेथे स्वतंत्र कागदावर रकान्यानुसार माहिती दिली आहे.

(अ) वैयक्तिक माहिती :

१. उमेदवाराचे नांव :
(आडनावाने सुरुवात करावी)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. पत्ता : | २.१ | कायमचा :- पत्ता | मुक्काम: | पोस्ट: | |
| | | | तालुका: | जिल्हा: | |
| | २.२ | पत्रव्यवहा-राचा पत्ता:- | मुक्काम: | पोस्ट: | |
| | | | तालुका: | जिल्हा: | |

३. जन्मतारीख :

४. शिक्षण :

५. वय :
( उमेदवाराचे वय ४५ वर्षापेक्षा जास्त असावे )

६. उमेदवाराचे वय ४५ वर्षापेक्षा कमी असल्यास :
अर्ज करणा-या अथवा शिफारस करणा-या
अधिका-याने वयाच्या बाबतीत अपवाद का
करण्यात यावा याची कारणे अथवा टिप्पणी
सोबत जोडली आहे का ?

७. धर्म/जात/जमात व पोटजात :

८. सध्याचा व्यवसाय :

...२/-

९. मातृभाषा व अवगत असलेल्या इतर भाषा बोलीभाषा. :

१०. पती/पत्नी हयात असल्यास पूर्ण नांव व वय :

कार्याचा आढावा :-

११. आदिवासी कार्याची/सेवेची प्रेरणा कशी निर्माण झाली व आदिवासी सेवेची / कार्याची सुरुवात कोठे, केव्हा व कशाप्रकारे सुरु केली. (आठवणीनुसार गांव, वर्ष इ. बाबींचा तपशील पूर्ण लिहावा) :

१२. आदिवासी कार्यात/सेवेत किती वर्ष आहेत (आदिवासी कार्य/सेवा कमीतकमी १० वर्षे तरी असावी) :

१३. १० वर्षापेक्षा कमी कार्य/सेवा असल्यास कोणत्या अपवादात्मक कारणांसाठी अर्ज भरण्यात आला आहे ? ती कारणे अथवा टिप्पणी सोबत जोडली आहे काय ? :

१४. उमेदवाराने कार्यास सुरुवात केली त्यावेळी समजकार्याचे/समाजसेवेचे स्वरुप कसे होते. :

१५. उपरोक्त १३ मधील त्या भागातील चालू समाजकार्याला समाजसेवेत आपण कार्य चालू केल्यानंतर वाढ कशाप्रकारे करण्यात आली. (१४ मध्ये उल्लेखित) स्वरुपामध्ये आढळलेल्या अटीबाबत काय सेवा केली असल्यास सविस्तर खुलासा करावा. कार्याच्या विस्ताराचे टप्पे कसे वाढत गेले. :

१६. आदिवासी क्षेत्रात काम करताना कोणत्या अडचणी आल्या. :

१७. त्या अडचणीतून मार्ग कसे काढले. त्याचा अंगीकृत कार्यास फायदा कसा झाला. :

....३/-

१८. केलेल्या सेवेमुळे / कार्यामुळे आदिवासींचा विकास : प्रगती कशी झाली (समाजसेवा कार्य व आदिवासी प्रगती/विकास एकमेकांशी पूरक परंतु स्वतंत्र विषय समजून सविस्तर माहिती द्यावी)

१९. आदिवासी समाज आणि आदिवासींना कसा व कितपत फायदा झाला. :
(वर्णनात्मक व संख्यात्मक माहिती द्यावी)

२०. शिक्षण, आरोग्य, शेती, सहकार, उद्योग, कला, संस्कृती, वाङःमय, जनजागृती इ. आदिवासी कार्याची / सेवेची क्षेत्रे आहेत. यापैकी कोणकोणत्या क्षेत्रात आदिवासीसाठी कार्य/ सेवा केली. कार्यानुरुप उदाहरणासह सविस्तर माहिती द्यावी. :

२१. आदिवासी समाजाचा विकास घडविण्यासाठी महत्त्वपूर्ण कार्य असल्यास उदाहरणासह तपशिल द्यावा. :

२२. ज्या विविध संस्थामार्फत आदिवासींसाठी कार्य केले आहे त्याबद्दलची थोडक्यात माहिती :- :

| अ.क्र. | संस्थेचे नांव | धारण केलेले पद | कालावधी | महत्त्वाच्या कार्याचे विवरण. |
|---|---|---|---|---|
| | | | | |

२३. शासनाने नियुक्त केलेल्या समितीचे आजी/माजी सदस्य होते काय १

| अ.क्र. | समितीचे नांव | सदस्यत्व<br>पूर्वीचे आजचे | कालावधी | या कालावधीत आदि-वासी विकासाच्या दृष्टीने केलेले कार्य. |
|---|---|---|---|---|
| | | | | |

२४. यापूर्वी प्राप्त झालेल्या शासकीय गौरव बहुमान याबाबतची माहिती. (आदिवासींसह अनुसूचित जाती/भटक्या व विमुक्त जाती, इतर मागासवर्गीय जाती व शारीरिक, सामाजिकदृष्टया अपंग, निराश्रीत इ. बाबतच्या कार्यासाठी ' दलितमित्र ' हा सन्मान शासन देते. या प्रपत्रात भरलेली माहिती अशा स्वरुपाची असल्यास तिकडे पाठवावी) :

२५. संसद सदस्य/विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य/जिल्हा परिषद सदस्य यापैकी कोणते सदस्य होते काय ? कोणते ? सध्या आहेत काय ? :

२६. शासनाने देऊ केलेला "आदिवासी सेवक" पुरस्कार स्विकारण्यास संमंती आहे काय ? :

२७. या व्यतिरिक्त माहिती द्यावयाची असल्यास नोंद करावी. :

२८. अर्जासोबत जोडलेल्या कागदपत्रांची संख्या व यादी. :

ठिकाण :

दिनांक : / / १९९

माहिती भरणाऱ्या
अधिकाऱ्याचे नांव,
हुद्दा व सही.

---

# प्रतिज्ञा निवेदन

मी सत्य प्रतिज्ञेवर निवेदन करतो की,

१. अर्जात देण्यात आलेली माहिती माझ्या सांगण्यानुसार श्री.______________________________ ____________________________________________यांनी लिहिलेली असून ती सत्य आहे.

२. यापूर्वी मला भारतीय दंडसंहिता १९६० च्या कायद्यानुसार दंड वा शिक्षा झालेली नाही. त्याबाबतचा दाखला सोबत जोडला आहे.

३. कोणत्याही न्यायालयात माझ्याविरुध्द कोणताही गुन्हा दाखल झालेला नाही.

४. आदिवासी सेवक पुरस्कार प्रदान केल्यास मी तो स्विकारीन.

ठिकाण :-

दिनांक :- / /१९९ ( )

उमेदवाराची स्वाक्षरी

-----------------------------------------------------------------------------------------

( ज्या कार्यालयामार्फत माहिती पाठविण्यात येईल त्यासाठी )

सन १९ - च्या अदिवासी सेवक पुरस्कारासाठी श्री. ___________________________ यांची माहिती खालील कारणास्तव आदिवासी सेवक पुरस्कार निवड समितीपुढे ठेवण्यास हरकत नाही.

१. माहिती तपासून कार्याची पडताळणी करण्यात आली आहे व ती सत्य आहे.

२. अर्जदाराच्या सत्य प्रतिज्ञेबाबतचे दाखले सोबत जोडले आहेत.

३. अर्जदाराची ३ (पासपोर्ट साईजची) छायाचित्रे सोबत स्वतंत्र पाकीटात जोडली आहेत.

४. शिफारस करणाऱ्या अधिकाऱ्याचे मत.

ठिकाण :-

दिनांक :- / / १९९

शिफारस करणा-या अधिकाऱ्याची स्वाक्षरी, नांव व हुद्दा.

-----------------------------------------------------------------------------------------

# परिशिष्ट

| | |
|---|---|
| १ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक टीएसपी-१०८३/४२/१२६५/का-१२, दिनांक ६ जून, १९८४. |
| २ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक टीआरआय-१०८५/८५-८६/सीआर-७६/का-३, दिनांक २४ जुलै, १९८६. |
| ३ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक टीएसपी-१०८७/सीआर-१९/का-३, दिनांक २९ जुलै, १९८७. |
| ४ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक टीआरआय-१०८८/सीआर-१९६/का-६, दिनांक २५ ऑगस्ट, १९८८. |
| ५ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक आसंसं-१०९२/प्र.क्र.४३/९२/का-५, दिनांक ६ नोव्हेंबर, १९९२. |
| ६ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक आसंसं-१०९२/प्र.क्र.४३/(९२)/का-५, दिनांक ११ मार्च, १९९३. |
| ७ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक आसेपु-१०९८/प्र.क्र.११५/का-५, दिनांक ५ ऑक्टोबर, १९९८. |